**सन २०१८-१९ मध्ये राज्यातील संभाव्य चारा टंचाईच्या पार्श्वभूमीवर राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत १०० टक्के अनुदानावर वैरण बियाणे व खते वितरण या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र.राकृवि-२०१८/प्र.क्र.१५२/पदुम-४,**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार, मुंबई.०३२ ४००-**
**दिनांक : २३ ऑक्टोबर, २०१८.**

वाचा :- १. आयुक्त पशुसंवर्धन महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयीन पत्र क्र.वैवि/ब-९(२)/ २६२८/२०१८, पुणे दि. १७.१०.२०१८.
२. अतिरिक्त आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र. .वैवि/ब-९(३)/३०१६/२०१८, पुणे दि. २०.१०.२०१८.
३. केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत दुष्काळ सदृष्य परिस्थितीवर मात करण्यासाठी राबवावयाच्या अतिरिक्त वैरण विकास कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ या वर्षात राज्यात सरासरीपेक्षा कमी पर्जन्यमान झालेले असून, सोलापूर जिल्ह्यात फक्त ३९.२ टक्के, औरंगाबाद व बीड जिल्ह्यात सरासरी ५० टक्के, जालना, लातूर, उस्मानाबाद, परभणी, नंदुरबार व जळगांव या जिल्ह्यात सरासरी ६० टक्के पर्जन्यमान झालेले असून, राज्यातील एकूण ३५५ तालुक्यांपैकी १७२ तालुक्यांमध्ये सरासरी पर्जन्यमान कमी असून, या तालुक्यांमध्ये चारा टंचाईची परिस्थिती उद्भवण्याची शक्यता आहे. दुष्काळ सदृश्य परिस्थितीमध्ये राज्यातील पशुधनास आवश्यक चारा उपलब्ध व्हावा तसेच, त्यांची रोगप्रतिकार शक्ती, प्रजनन क्षमता कायम रहाण्यास मदत व्हावी याकरिता राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत १०० टक्के अनुदानावर वैरण पिकांचे बियाणे व खते वितरण हा प्रकल्प राबविण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९ मध्ये राज्यातील संभाव्य चारा टंचाईच्या पार्श्वभूमीवर राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत १०० टक्के अनुदानावर वैरण बियाणे व खते वितरण या प्रकल्पास याद्वारे, शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तसेच, या प्रकल्प प्रित्यर्थ होणा-या रू.१०.०० कोटी खर्चास वित्तीय मान्यता देखील प्रदान करण्यात येत आहे. हा प्रकल्प सन २०१८-१९ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत उपलब्ध होणा-या निधीच्या अधिन राहून खालील नमुद बाबी विचारात घेऊन राबविण्यात यावा.

१. राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत केंद्र शासनाने दुष्काळी परिस्थितीवर मात करण्याकरिता राबवावयाच्या अतिरिक्त वैरण विकास कार्यक्रमासाठी माहे ऑक्टोबर २०१७ मध्ये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचनांमधील अपेंडिक्स - ए मध्ये निश्चित करण्यात आलेल्या चार बाबींपैकी आर्थिक निकषाच्या अनुषंगाने केवळ **वैरण बियाणे व खते** या दोन निविष्ठांसाठीच प्रती १० गुंठे रू.४६०/- (अक्षरी रू. चारशे साठ मात्र) च्या मर्यादेत अनुदान देण्यात यावे.

२. सदरचा प्रकल्प केंद्र शासनाने राष्ट्रीय कृषि विकास योजनेसंदर्भात अतिरिक्त वैरण विकास कार्यक्रमाच्या अनुषंगाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून राबविण्यात यावा.

३. टंचाईग्रस्त घोषित केलेल्या जिल्ह्यातील ज्या शेतक-यांकडे सिंचनाची सुविधा व पशुधन आहे अशा प्रति शेतकरी लाभार्थ्यास कमाल एका हेक्टर क्षेत्रासाठी रू.४,६००/- (अक्षरी रू.चार हजार सहाशे मात्र) च्या मर्यादेत १०० टक्के अनुदानावर वैरण बियाणांचा व खताचा पुरवठा करण्यात यावा.

४. तरी तुर्त उपलब्ध करून देण्यात येत असलेल्या रू.१०.०० कोटी निधी मधून एकूण २१,७४० हेक्टर क्षेत्रावर हिरवी वैरण उत्पादनाचा कार्यक्रम सर्वोच्य प्राधान्याने राबविण्यात यावा व यामधून कमीत कमी ४० मे.टन प्रति हेक्टर याप्रमाणे एकूण ८.७ लक्ष मे.ट.वैरणीचे उत्पादन होण्यासाठी आवश्यक ते नियोजन करण्यात यावे.

५. या प्रकल्पांतर्गत उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करून, विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

६ या प्रकल्पांतर्गत उपलब्ध झालेला निधी व त्याचा विनियोग याबाबतचा हिशोब स्वतंत्रपणे विहीत केलेल्या लेखा पध्दतीनुसार ठेवण्यात यावा.

७. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त हे या योजनेचे आहरण व संवितरण अधिकारी राहतील

८. राज्यस्तरावर या प्रकल्पाचे अंमलबजावणी अधिकारी आयुक्त पशुसंवर्धन तर विभागीय स्तरावर संबंधित विभागाचे प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन हे राहतील.

९. सदर प्रकल्पास आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान करावी.

१०. या प्रकल्पाच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सूचना आयुक्त पशुसंवर्धन यांनी त्यांच्या स्तरावरून सर्व संबंधित अधिकारी यांना तात्काळ निर्गमित कराव्यात.

११. सदरच्या प्रकल्पास राष्ट्रीय कृषी विकास योजनेअंतर्गतच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या आगामी बैठकीत कार्योत्तर मान्यता प्रदान करून घेण्यात यावी.

१२. सदरचा प्रकल्प राबविल्यानंतर आयुक्त पशुसंवर्धन, पुणे यांनी प्रकल्पाचा फलश्रुती अहवाल त्यांच्या अभिप्रायासह शासनास सादर करावा.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१८१०२३१६०५५१११०१ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Shri Ravindra Gurav

Digitally signed by Shri Ravindra Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, cn=Shri Ravindra Gurav
Date: 2018.10.23 16:10:29 +05'30'

**(रविंद्र गुरव)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे
८. आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, मध्यवर्ती इमारत, पुणे
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०. जिल्हाधिकारी (सर्व)
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२. उपसचिव (राष्ट्रीय कृषि विकास योजना कक्ष), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / लेखा परिक्षण, मुंबई / नागपूर.
१४. प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन (सर्व)
१५. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, (सर्व)
१६. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१७. निवड नस्ती, पदुम-४